**श्री.नेताजी आत्माराम ताजणे ,सालई, ता-सावणेर, जि.नागपूर यांनी अतिरिक्त जिल्हा तक्रार निवारण मंच, नागपूर यांचेकडे दाखल केलेल्या अर्जावरील दि.६/३/२०१९ रोजीच्या न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने नुकसानभरपाईची रक्कम मा.न्यायालयात जमा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०१९/प्र.क्र.८०/१३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३० जुलै, २०२०

**वाचा:-** १) अतिरिक्त जिल्हा तक्रार निवारण मंच, नागपूर यांनी दि. ६/३/२०१९ रोजी दिलेला न्यायनिर्णयानुसार.
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र क्र. कृआ/फलो-२/ताजणे/कोर्ट/१४६६/२०, दिनांक १४/०१/२०२०

**प्रस्तावना:-**

श्री.नेताजी आत्माराम ताजणे, यांची मौजे सालई,ता.सावनेर,जि.नागपूर येथे ३.२० एकर शेतजमिनीत सन १९९० मध्ये कृषि विभागाकडून महाराष्ट्र स्टेट हॉर्टीकल्चर स्कीम ही योजना राबविली होती. त्या यांजनेतर्गत लाभ घेतला होता. योजनेंतर्गत तक्रारदार यांनी संत्र्यांची झाडे लावण्याकरिता रु.१७,०००/- चे कर्ज घेतले व शासकीय फळरोपवाटिका, तिंडगी येथून एकूण २७० सत्र्यांची झाडे घेऊन त्याचे अडीच एकर क्षेत्रामध्ये सन १९९० मध्ये लागवड केली. प्रतिवर्षी रु.२०,०००/- प्रमाणे त्याचे मशागत व देखभाल खर्च केला. सन १९९५ मध्ये त्यापैकी काही कलमाच्या झाडांना फळ लागलेली इतर झाडाना एकही फळ लागले नव्हते. श्री.ताजणे यांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या ही बाब लक्षात आणून दिली. सदर अधिकाऱ्यांनी शेतास भेट देवून तपासणी केली नाही किंवा खुलासा त्यांनी केला नाही. फळझाडे लागवडीतील तज्ञ श्री.एस.डी. उमाळे यांच्याकडून अहवाल प्राप्त करून घेतला. सदर संत्र्यांच्या झाडावर झालेला खर्च व नुकसान भरपाईसाठी त्यांनी ग्राहक मंचाकडे ग्रा.सं.का.चे कलम १२ अन्वये निकृष्ट दर्जाची कलमे दिल्याने नुकासान भरपाई मिळणेबाबत दावा दाखल केला होता.

अतिरिक्त जिल्हा तक्रार निवारण मंच, नागपूर यांनी दिलेल्या दि.६/३/२०१९ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार श्री. ताजणे यांना नुकसानीची रक्कम रु.३,४४,०४६/- व त्यावरील देय व्याज रु.८,१८,४५२/- तसेच तक्रारीच्या खर्चापोटी रु.५०००/- अशी एकूण रक्कम रु.११,६७,४९८/- एवढी तक्रारदार यांना द्यावयाचे आदेशित केले आहे. अतिरिक्त जिल्हा तक्रार निवारण मंच, नागपूर यांनी दिलेल्या दि.६/३/२०१९ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करणे योग्य आहे किंवा अपिल करणे योग्य राहील याबाबत सहसचिव,विधी व न्याय विभाग, नागपूर यांनी सदर प्रकरणी निर्णय घेणे हे विभागाचे अधिकारात असल्याचे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार सदर प्रकरणी अनुदान उपलब्ध करून देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय:-

अतिरिक्त जिल्हा तक्रार निवारण मंच, नागपूर यांच्या दि. ६/३/२०१९ रोजीच्या न्याय निर्णयानुसार नुकसान भरपाईची रक्कम रु.३,४४,०४६/-व त्यावरील व्याज रु. ८,१८,४५२/- अशी एकूण रक्कम रु. ११,६७,४९८/- होत आहे. आता ती एकूण रक्कम रु.११,७३,११२/- एवढी झालेली असल्याचे कृषि आयुक्तालयाने कळविले आहे. सदर रक्कम मा. न्यायालयात जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री. ताजणे यांना प्रत्यक्ष रक्कम अदा होईपर्यत चे द.सा.द.शे. १२ टक्के व्याजासह असलेली रक्कम ही दिवसेन दिवस वाढतच आहे. श्री. ताजणे यांना द्यावयाच्या रक्कमेची अचूक परिगणना करून त्या रक्कमेची खातरजमा करुन शासनाचे प्रचलित नियम, आदेश, अटी व शर्ती यांचे अनुपालन करण्यात यावे. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

३. वरील रक्कम लेखाशिर्ष,२४०१-पीक संवर्धन,१९ (०३) रोपमळे,(०३)(०१) भाजीपाला, रोपमळे, फळरोपमळे व स्थानिक उद्याने. (२४०१ १७२२) अंतर्गत १३-कार्यालयीन खर्च याबाबी खाली प्राप्त अनुदानातून भागविण्याबाबतची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१७१२४९३७५७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्रांचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.08.17 13:05:37 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय. मुंबई.
२) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई./नागपूर
४) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य पुणे.
५) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) सह सचिव (फलोत्पादन) कृषि पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.
७) सह संचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे.
८) विभागीय कृषि सह संचालक , नागपूर.
९) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,नागपूर.
१०) जिल्हा कोषगार अधिकारी,नागपूर
११) निवड नस्ती-१३-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.